71\D:\TRA-4\TRA-5 - P.L.A. Gr. tra5.lwp

पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण व अतिरिक्त जिल्हा न्यायाधीश, कल्याण, यांना त्यांच्या न्यायाधिकरणाकरीता स्वीय प्रपंजी लेखा उघडण्यास अनुमती देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक : एमसीटी-०५०३/७३६/प्र.क्र.९०/परि-५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : २८ एप्रिल, २००४

वाचा :- १) शासन अधिसूचना, गृह विभाग क्र.एमसीटी-०४९८/सीआर-२३ (अे)/परि-५, दि. ११.८.२०००
२) अपर जिल्हा व सत्र न्यायाधिश, कल्याण यांचे पत्र क्र. १५२७/२००३, दि. १७.१०.२००३
३) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) यांचे पत्र क्र.अे/१२२४/८०,दिनांक २४.४.२००३
४) शासन निर्णय गृह विभाग, क्रमांक. एमसीटी ०५०३/७३६/सीआर-९०/परि-५, दि. ३०.६.२००३.

शासन निर्णय :- मोटार वाहन अधिनियम १९८८ (१९८८ चा ५९) च्या कलम १६५ (२) च्या अधिकारानुसार शासन अधिसूचना, गृह विभाग क्र.एमसीटी-०४९८/सीआर-२३ (अे)/परि-५, दि. ११.८.२००० अन्वये कल्याण, जि.ठाणे येथे मोटार अपघाताचे दावे चालविण्यासाठी एक सदस्यीय मोटार अपघात दावा न्यायाधिकरण स्थापण्यात आले. त्यानुसार अतिरिक्त जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, कल्याण, जि. ठाणे यांची या न्यायाधिकरणावर पदसिध्द सदस्य म्हणून नेमणूक करण्यात आली. शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक.एमसीटी-०५०३/७३६/सीआर-९०/परि-५, दि.३०.६.२००३ च्या आदेशान्वये त्यांना कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले. सदर न्यायाधिकरणात मोटार अपघाताच्या नुकसान भरपाईच्या संदर्भात प्राप्त होणाऱ्या रकमांसाठी महाराष्ट्र कोषागार नियम १९६८, खंड १ मधील नियम ५१२ मधील तरतूदीनुसार पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, कल्याण जिल्हा ठाणे यांचे पदनामाने संबंधित कोषागारात स्वीय प्रपंजी लेखे (पी.एल.ए.) लेखा परिक्षेच्या अधीन राहून उघडण्यास शासन याद्वारे मंजूरी देत आहे. सदर लेखा ज्या प्रयोजनासाठी वापरण्यास मान्यता देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनासाठी वापरण्यात यावा.

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक.३१/कोषा-प्र.५, दि.१२.३.२००४ अन्वये तसेच महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, मुंबई यांच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.टिएम/सीएच-२/युओआर/२००३-२००४/१९८९, दिनांक ३१.३.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(आ. बा. कमाले)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई (पत्रान्वये)
अतिरिक्त जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधिश व पदसिध्द सदस्य,मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, जिल्हा ठाणे
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र- २, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/ निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, कल्याण/ठाणे
वित्त विभाग, कोषा-५, विनियम/ व्यय ८,